महाराष्ट्र शासन

फॅक्स क्र.(०२२) २२८८६०२४

क्रमांक :- आसुअं २०१४/दत्तमत/(प्र.क्र.१९/११)/का.१३

विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक :- ३१ मार्च, २०११.

प्रति,

मा.सह सचिव (का.१५)
विधी व न्याय विभाग,
मंत्रालय, मुंबई .

विषय :- सन २०१०-११ या वर्षाकरिता सुधारित अनुदानाचे वाटप -"मागणी क्रमांक जे-१,२०१४ न्यायदान (दत्तमत)८०० इतर खर्च (००) (०१) जनावरास निर्दयतेने वागविण्यास प्रतिबंध व निर्धनपेटी निधी - (२०१४०३२३) "

महोदय,

उपरोक्त विषयाधीन मुख्यलेखाशिर्षाखालील सन २०१०-११ या वित्तीय वर्षाचे उद्दिष्टनिहाय सुधारित अनुदानाचे वाटप सोबतच्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे मान्य करण्यात येत आहेत.

२. संबंधित नियंत्रक / प्राक्कलन अधिकाऱ्यांना विनंती करण्यात येते की, विवरणपत्रात दर्शविलेल्या रकमा, चालू वित्तीय वर्षामध्ये आठमाही सुधारित अनुदान म्हणून मंजूर करण्यात आल्या आहेत. त्यामुळे कोणत्याही परिस्थितीत प्रत्येक उद्दिष्टनिहाय मंजूर तरतूदीपेक्षा अधिक खर्च होणार नाही. तसेच वित्तीय अनियमितता होणार नाही याची विशेष दक्षता घेण्यात यावी. यासंदर्भात अर्थसंकल्पीय नियमावलीतील नियमाचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. ज्या उद्दिष्टाखाली अनुदानामध्ये आपल्या कार्यालयाकरिता तरतूदीमध्ये घट झाली आहे तेवढी रक्कम तात्काळ अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे शासनास परत करावी. ज्या उद्दिष्टाखाली अनुदानात वाढ करण्याचे स्विकृत केले आहे,त्या उद्दिष्टाखालील अतिरिक्त अनुदान पुरक मागणीद्वारे उपलब्ध होणार असल्याने सदर अनुदान पुरक मागणी विनीत झाल्याशिवाय खर्च करण्यात येऊ नये.

३. प्राक्कलन अधिकाऱ्यांनी संबंधित तपशीलवार उपशीर्षनिहाय उद्दिष्टनिहाय सुपुर्द केलेले अनुदान विचारात घेऊन, दिनांक ३१ मार्च २०११ पर्यंत होणाऱ्या अचूक खर्चाचे अंदाज संपूर्ण तपशीलवार विवरणपत्र अ मध्ये दर्शवून बचतीचा अहवाल सोबतच्या विवरणपत्रामध्ये कोणत्याही परिस्थितीत दिनांक ३० मार्च, २०११ पूर्वी शासनास प्राप्त होतील याबाबत विशेष काळजी घेण्यात यावी. तसेच बचतीचे अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे देखील शासनास परत करण्यात यावे, ही विनंती.

४. संबंधित नियंत्रक / प्राक्कलन अधिकाऱ्यांचे लक्ष शासन परिपत्रक क्रमांकः बीयुजी १०८८/३८३४/४०/११, दिनांक २० एप्रिल, १९९१ कडे वेधण्यात येत असून त्यांना विनंती करण्यात येते की, त्यांच्याकडे सुपूर्द केलेल्या अनुदानातून जरी बचत स्पष्ट होत नसली तरीही बचतीचा अहवाल विहित तारखेपूर्वी न चुकता पाठविण्यात यावा. असल्यास ज्या कार्यालयांकडे विनिर्दिष्ट प्रयोजनार्थ तरतूद सुपूर्द केलेली आहे त्याच प्रयोजनासाठी जेवढी रक्कम वापरलेली आहे ती वगळता उर्वरित रक्कम इतरत्र न वापरता निव्वळ बचतीची रक्कम म्हणून कारणे व समर्थनासह विनिर्दिष्टपूर्वक खर्चात कपात करुन परत केली तरच त्यास बचतीची रक्कम म्हणून समजण्यात येईल.

५. दूरध्वनी,वीज व पाणी शुल्क या उद्दिष्टाकरिता वापरण्यात आलेल्या (-) वजा रकमेइतकी रक्कम कार्यालयीन खर्चात शिल्लक ठेवण्यात यावी जेणेकरुन अंतिम समायोजनामध्ये याबाबतचे पुनर्विनियोजन करणे शक्य होईल.

६. ज्या उद्दिष्टाखाली अनुदान कमी झालेले आहे ते संगणकीय वितरण प्रणालीद्वारे परत करण्यात यावे.

५. बचतीसंबंधात अपेक्षेपेक्षा खर्च कमी अथवा अनुदान उशिरा प्राप्त झाले आणि अधिक खर्चासंबंधात मागणीपेक्षा अनुदान कमी मिळाले अशा प्रकारची बचत/वाढीचे समर्थन/कारणे नमूद न करणे अर्थसंकल्पीय नियमनाच्या दृष्टीकोनातून योग्य ठरत नाही, याचीही कृपया नोंद घेण्यात यावी.

आपला

( मि.श्री.पाटील )

कार्यासन अधिकारी

सोबत:- वरीलप्रमाणे.

प्रती: माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.

महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने)

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा)-एक,महाराष्ट्र,मुंबई.

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरीक्षा)- दोन ,महाराष्ट्र, नागपूर

जिल्हा कोषागार अधिकारी

अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

निवासी लेखा परीक्षा अधिकारी , मुंबई , (२ प्रती),

उप सचिव, (सेवा) विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

कार्यासन अधिकारी- फ्र २४ विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.

वित्त विभाग, अर्थसंकल्प-१२/व्यय-६,

निवडनस्ती.

## विवरणपत्र - अ

सन २०१०-११ च्या बचतीच्या रकमा परत करण्याबाबतचा अहवाल

**लेखाशीर्ष :-** मागणी क्रमांक जे-१,२०१४ न्यायदान (दत्तमत) "मागणी क्रमांक जे-१,२०१४ न्यायदान (दत्तमत)११४ (००) (०२) मुफसल अधिकारी (२०१४०३०१)"

(रुपयांमध्ये)

| तपशीलवार लेखाशीर्ष | मंजूर अनुदान | दिनांक २८.२.१० पर्यंतचा प्रत्यक्ष खर्च | उर्वरित कालावधीतील संभाव्य खर्च | एकूण (३+४) | बचत (-) किंवा वाढ (+) | बचत/वाढीची सुस्पष्ट कारणे (रकाना रिका ठेवू नये) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| | | | | | | |

## विवरणपत्र "ब"

**(रुपये हजारात)**

| तपशीलवार लेखाशीर्ष (संकेतांक क्रमांकासह) | सन २०१०-११ या वित्तीय वर्षासाठी सुधारित अनुदानाचे वाटप |
|---|---|
| "मागणी क्रमांक जे-१,२०१४ न्यायदान (दत्तमत) ८०० इतर खर्च (००)(०१) जनावरांस निर्दयपणे वागविण्यास प्रतिबंध व नियंत्रणेटी (२०१४ ०३२१ ) | |
| ०३१ सहाय्यक अनुदान | ३८५ |
| एकूण | ३८५ |